**गोसीखुर्द राष्ट्रीय प्रकल्पाची उर्वरीत कामे एन. बी. सी. सी. (इंडीया) या कंपनीस सामंजस्य कराराच्या माध्यमातून देणेसाठी देय एजन्सी चार्जेस निश्चित करण्यासाठीची समिती स्थापणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्र. संकिर्ण २०१६/(४६८/१६)/मोप्र-२**
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक : ०५ जानेवारी, २०१७.

**प्रस्तावना :**

गोसीखुर्द राष्ट्रीय प्रकल्प हा गोसीखुर्द गावाजवळ (तालुका पवनी) जिल्हा भंडारा येथे वैनगंगा नदीवर बांधकामाधीन प्रकल्प आहे. सदर प्रकल्प हा महाराष्ट्रातील एकमेव राष्ट्रीय प्रकल्प असून त्यास केंद्र शासनाकडून ९०% अर्थसहाय्य प्राप्त होते. गोसीखुर्द राष्ट्रीय प्रकल्पाच्या प्रकल्प घटकांची जलसंपदा विभागाचे सन २०१२-१३ चे दरसुचीच्या व सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सन २०१३-१४ चे दरसुचीवर आधारित सुमारे रु.१०५८ कोटी अंदाजित किंमतीची कामे सामंजस्य कराराचे माध्यमातून नॅशनल बिल्डिंग कंस्ट्रक्शन कॉर्पोरेशन (एन. बी. सी. सी.) (इंडीया) लिमिटेड या पब्लिक वर्क ऑर्गनाझेशन (PWO) या कंपनीस पहिल्या टप्यात देण्याबाबतचा निर्णय दि.१५.१२.२०१६ रोजी मा. मंत्रीमंडळाने घेतला आहे. त्याअनुषंगाने नॅशनल बिल्डिंग कंस्ट्रक्शन कॉर्पोरेशन (एन. बी. सी. सी.) (इंडीया) लिमिटेड या कंपनीस द्यावयाचे एजन्सी चार्जेस निश्चित करणेसाठी समिती स्थापन करणे शासनाच्या विचाराधीन होते. त्यास अनुसरुन शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :**

गोसीखुर्द राष्ट्रीय प्रकल्पाची **परिशिष्ठ-१** मधील नमुद प्रकल्प घटकांची जलसंपदा विभागाचे सन २०१२-१३ चे दरसुचीच्या व सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सन २०१३-१४ चे दरसुचीवर आधारित सुमारे रु.१०५८ कोटी अंदाजित किंमतीची कामे सामंजस्य कराराचे माध्यमातून नॅशनल बिल्डिंग कंस्ट्रक्शन कॉर्पोरेशन (एन. बी. सी. सी.) (इंडीया) लिमिटेड या कंपनीस पहिल्या टप्यात देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. यासाठी नॅशनल बिल्डिंग कंस्ट्रक्शन कॉर्पोरेशन (एन. बी. सी. सी.) (इंडीया) लिमिटेड या कंपनीस द्यावयाचे एजन्सी चार्जेस निश्चित करणेसाठी खालीलप्रमाणे समिती स्थापन करण्यात येत आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| १ | अतिरीक्त मुख्य सचिव (वित्त) | - | अध्यक्ष |
| २ | प्रधान सचिव (जलसंपदा) | - | सदस्य |
| ३ | प्रधान सचिव (विधी व न्याय) | - | सदस्य |
| ४ | सचिव (प्रकल्प समन्वय, जलसंपदा विभाग | - | सदस्य सचिव |
| ५ | कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर | - | निमंत्रित सदस्य |
| ६ | अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, नॅशनल बिल्डिंग कंस्ट्रक्शन कॉर्पोरेशन(इंडिया), मर्यादित | - | निमंत्रित सदस्य |

२. सदर समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे राहील.

२.१) गोसीखुर्द राष्ट्रीय प्रकल्पाची **परिशिष्ठ-१** मधील नमुद प्रकल्प घटकांची जलसंपदा विभागाचे सन २०१२-१३ चे दरसुचीच्या व सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सन २०१३-१४ चे दरसुचीवर आधारित सुमारे रु.१०५८ कोटी अंदाजित किंमतीची कामे देण्यासाठी नॅशनल बिल्डिंग कंस्ट्रक्शन कॉर्पोरेशन (एन. बी. सी. सी.) (इंडीया) लिमिटेड या कंपनीस द्यावयाचे एजन्सी चार्जेस निश्चित करावेत.

२.२) **एन.बी.सी.सी. इंडिया लि. या कंपनीची कामाची व्याप्ती**

आवश्यक सर्वेक्षण व अन्वेषण, घटक कामांची संकल्पचित्रे तयार करणे, ती मुख्य अभियंता यांचेकडून मान्य करुन घेणे, अंदाजपत्रक तयार करणे, निविदा संच तयार करणे, निविदा निश्चित करणे, कामाची अंमलबजावणी, सुपरव्हीजन, गुणनियंत्रण, देयके तयार करणे, Defect liability period पर्यंत कंत्राट व्यवस्थापन अशी राहील. वरीलप्रमाणे कामाची व्याप्ती विचारात घेऊन एजन्सी चार्जेस निश्चित करावेत.

३. या समितीने अहवाल सादर करावयाचा कालावधी १५ दिवसांचा असेल.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०१०५१६५३५६३९२७ असा आहे.हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pandurang Tulshiram Kedare

Digitally signed by Pandurang Tulshiram Kedare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e594e26c6ca4bffd8b1d4e20a155e473c21b0dd40f25c25bd478079005896501, cn=Pandurang Tulshiram Kedare
Date: 2017.01.05 16:58:36 +05'30'

**(पां. तु. केदारे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
३) सर्व मा. मंत्री/ मा. राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
५) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
६) वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय, मंबई-३२.
७) नियोजन विभाग (कार्यासन १४३४), मंत्रालय, मंबई-३२.
८) कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर.
९) महासंचालक, संकल्पचित्र, प्रशिक्षण, जलविज्ञान, संशोधन व धरण सुरक्षा, नाशिक .
१०) अध्यक्ष वजा व्यवस्थापकीय संचालक, नॅशनल बिल्डिंग कंस्ट्रक्शन कॉर्पोरेशन(इंडिया), मर्यादित, एन.बी.सी.सी. भवन, लोधी रोड, नवी दिल्ली.

११) मुख्य अभियंता, गोसीखुर्द प्रकल्प, जलसंपदा विभाग, नागपूर.
१२) आंतर वित्त सल्लागार व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मंबई-३२.
१३) अधिक्षक अभियंता, गोसीखुर्द प्रकल्प मंडळ, नागपूर.
१४) अधिक्षक अभियंता, गोसीखुर्द उपसा सिंचन मंडळ, आंबाडी.
१५) अधिक्षक अभियंता, नागपूर पाटबंधारे मंडळ, नागपूर.
१६) जिल्हाधिकारी, भंडारा/नागपूर/चंद्रपूर.
१७) उप सचिव (निवसं), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मंबई-३२.
१८) अर्थ शाखा १ व २, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मंबई-३२.
१९) कार्यासन मोप्र-२ संग्रहार्थ.

## परिशिष्ठ-१

गोसीखुर्द राष्ट्रीय प्रकल्पाची नॅशनल बिल्डिंग कंस्ट्रक्शान कॉर्पोरेशन (एन. बी. सी. सी.) (इंडीया) लिमिटेड या पब्लिक वर्क ऑर्गनाझेशन (PWO) या कंपनीमार्फत करावयाची कामे

| अ. क्र. | घटक | प्रकल्पाची प्रस्तावित सुप्रमा किंमत (सन २०१३-१४) | मार्च-२०१६ पर्यंत झालेला खर्च | प्रकल्पाची उर्वरित किंमत (रू.कोटीमध्ये) | एनबीसीसी मार्फत प्रथम टप्यात कार्यान्वयीत करावयाच्या प्रकल्प घटकाची किंमत रु. कोटी |
|---|---|---|---|---|---|
| १ | शिर्षकामे | ४७९४.५६ | ३३५७.५५ | १४३७.५५ | २२२ |
| २ | उजवा कालवा | ४९३७.९९ | २७८४.०० | २१५३.९९ | २५० |
| ३ | डावा कलवा | ६६२.३५ | ३२४.०८ | ३३८.२७ | ० |
| ४ | नेरला उसिंयो | १२७६.३८ | ४७१.८० | ८०४.५८ | ३६२ |
| ५ | आंभोरा उसिंयो | ३४१.०४ | ३२८.३० | १२.७४ | ० |
| ६ | मोखाबर्डी उसिंयो | २५७७.१९ | १०६५.०० | १५१२.१९ | २०५ |
| ७ | आसोला मेंढा नुतनीकरण | १७९६.४८ | २६२.०० | १५३४.४८ | ० |
| ८ | इतर उसिंयो | ६११.८० | ३.६३ | ६०८.१७ | १९ |
| | **एकूण** | **१७०७८.६०** | **८६८१.३२** | **८३९७.८२** | **१०५८** |

टिप :- उपरोक्त प्रकल्प कामाच्या अंदाजित किंमती जलसंपदा विभागाचे सन २०१२-१३ चे दरसुचीवर आधारित व सार्वजनिक बांधकाम विभागाचे सन २०१३-१४ चे दरसुचीवर आधारित आहेत.